**वन्यप्राणी रक्षण व निसर्गसंरक्षण या योजनेत्तर योजनेखालील १४३ अस्थायी पदे २०१५-१६ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र.१४ /फ-१.**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ०५ फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, डब्ल्यूएलपी ०२.१४/प्र.क्र.५३/फ-१, दिनांक:- १०.०३.२०१४.

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक:- ०४.१०.२००४.

३. शासन निर्णय क्र. एफएसटी-१९०४/प्र.क्र.१०९/फ-४ दिनांक:- ०८.०८.२००६.

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजनेत्तर/ प्र.क्र.०४/१४-१५/१५५१, नागपूर, दिनांक :- २०.१२.२०१४.

**शासन निर्णय :-**

वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेत्तर योजनेखालील १४३ अस्थाई पदांना वरील अनुक्रमांक १ येथील दिनांक १०.०३.२०१४ च्या शासन निर्णयान्वये सन २०१४-१५ या अर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ पर्यंत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे. योजनेत्तर योजनेंतर्गत १८४ पदापैकी ४१ पदांचे शासन निर्णय एफएसटी-१९०४/प्र.क्र.१०९/फ-४ दिनांक ०८.०८.२००६ नुसार स्थायीकरण करण्यात आले आहे.

२. वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेत्तर योजनेखालील १४३ अस्थाई पदास पूढे चालू ठेवण्याबाबत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे उपरोक्त वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेत्तर योजनेखालील १४३ अस्थाई पदास सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात दिनांक ०१.०३.२०१५ ते दिनांक २९.०२.२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. वन्यप्राणी रक्षण व निसर्ग संरक्षण (योजनेत्तर) या योजनेत्तर योजनेखालील १४३ अस्थाई पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संरक्षण (००) (०१) निसर्ग संवर्धन व वन्य पशू संरक्षण

(२४०६ ०७६६) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ या वर्षासाठी उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२/(भाग-२) / २००४/ वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१६४८३९४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APTE
ARVIND
SHANKAR

Digitally signed by APTE ARVIND SHANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 918010, postalCode=400032, st=Maharashtra, cn=APTE ARVIND SHANKAR
Date: 2015.02.05 16:56:42 +05'30'

**( अरविंद आपटे )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**सोबत :** विवरणपत्र

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), म.रा.नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा., नागपूर.
४. मुख्य वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व). / वनसंरक्षक, प्रादेशिक (सर्व).
५. उपवनसंरक्षक,यावल/जळगांव/अकोट/धारणी/नांदेड/पुसद/पुणे/सावंतवाडी/औरंगाबाद/ नागपूर/वर्धा/अहमदनगर/अलीबाग/कोल्हापूर/ताडोबा राष्ट्रीय उद्यान, चंद्रपूर.
६. उप विभागीय वन अधिकारी, भोर/सांगली.
७. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा), म.रा.मुंबई/नागपूर.
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी ०१.१५/प्र.क्र. १४/फ-१, दिनांक :- ०५.०२.२०१५ सोबतचे सहपत्र**

| अ.क्र | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) | १ |
| २ | वनसंरक्षक | १ |
| ३ | वनपाल | २० |
| ४ | वनरक्षक | ७४ |
| ५ | शिपाई | ६ |
| ६ | चौकिदार | १ |
| ७ | खानसामा नि चौकिदार | २ |
| ८ | सफाई कामगार | १ |
| ९ | माळी | १७ |
| १० | हत्यारी पोलीस शिपाई | २ |
| ११ | वाहन चालक | ९ |
| १२ | स्वच्छक | १ |
| १३ | पहारेकरी | ७ |
| १४ | वनपाल (गाईड) | १ |
| | एकूण | १४३ |

*****